कालमर्यादा




नविन कुमार
प्रधान सचिव (सेवा)

अर्ध शासकीय पत्र क्रमांक: विपुस–1098/प्र.क्र.20/98/15,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई 400 032.
दिनांक : 07 फेब्रुवारी 1998.

**विषय :–** अकार्यक्षम अधिकारी/कर्मचारी यांचे वयाच्या 50/55 व्या वर्षी पुनर्विलोकन कडकपणे विहित मुदतीत करण्याबाबत.

**संदर्भ :–**
(1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरसी–1082/952/15, दिनांक 1 सप्टेंबर 1983.
(2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरसी–1085/1029/43/15, दिनांक 12 मे 1986.
(3) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरसी–1085/1029/43/15, दिनांक 1 एप्रिल 1989.
(4) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरसी–1085/1029/43/15, दिनांक 24 फेब्रुवारी 1993.

प्रिय

शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या वयाच्या 50/55 व्या वर्षापलिकडे किंवा त्यांची अर्हताकारी सेवेची 30 वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांची सेवा शासन सेवेत पुढे चालू ठेवण्याची पात्रापात्रता अजमाविण्या–साठी त्यांचे गोपनीय अहवाल, सचोटी व शारिरीक क्षमता या विहित केलेल्या निकषांच्या आधारे त्यांच्या प्रकरणांचे पुनर्विलोकन करून सुयोग्य व कार्यक्षम अधिकारी/कर्मचारी यांना शासन सेवेत पुढे चालू ठेवावे व अकार्यक्षम तसेच संशयास्पद सचोटी असणा–या अधिकारी/कर्मचा–यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे. या धोरणाशी संबंधित सुस्पष्ट आदेश संदर्भाधीन परिपत्रकांन्वये यापूर्वीच देण्यात आलेले आहेत. संदर्भाधीन शासन परिपत्रकाच्या प्रती सुलभ संदर्भासाठी सोबत जोडल्या आहेत.

2 शासकीय अधिकारी/कर्मचारी यांची वयाच्या 50/55 व्या वर्षापलिकडे अथवा विहित सेवा–कालावधीच्या पुढे शासन सेवेत राहण्याची पात्रापात्रता अजमाविण्यासाठी त्यांच्या सेवेचे काटेकोरपणे पुनर्विलोकन करावे अशी विनंती या अर्ध शासकीय पत्राव्दारे आपणास करण्यात येत आहे.

3. याचबरोबर आपल्या विभागातील तसेच विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेल्या

कार्यालयांतील सन 1995 ते 1997 या तीन वर्षांत पुनर्विलोकनाच्या निर्णयांती किती अकार्यक्षम शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्यात आले आहे याची वर्षनिहाय तसेच प्रवर्ग निहाय एकत्रित माहिती सोबतच्या विहित तक्त्यात भरून कृपया **15 दिवसांत** या विभागाकडे पाठवावी.

आपला,

नविनकुमार

(नविन कुमार)

**सहपत्र :** वरीलप्रमाणे.

प्रति

सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.

प्रत

मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.

निवड नस्ती.

---

शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे विहित वयोमर्यादेच्या वेळी/विहित सेवावधीच्या वेळी सेवा पुनर्विलोकन करुन ज्या अकार्यक्षम अधिकारी/कर्मचा–यांना मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्यात आले आहे अशा अधिकारी/कर्मचा–यांची माहिती.

वर्ष :-

प्रशासकीय विभाग :-

| अनुक्रमांक | कार्यालय | शासकीय अधिकारी/कर्मचा–याचे नाव | पदनाम | प्रवर्ग | मुदतपूर्व सेवानिवृत्त केल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| (1) | (2) | (3) | (4) | (5) | (6) |

शामम़ु–रोटा–साप्रवि–गृत्त–1387(ब)(3700–2–98)